करण्यांत कदाचित् आपण मरून आपल्या स्वामीस यश देतो, तद्वत् , विचार नाहींसा होऊन ब्रह्माची व्यक्तता करितो.

**नाना नाश साधुनी आपुला । बोध बोधें लाजिन्नला ॥**
**नुसधेपणें थोटावला । अनुभवू जेथ ॥ ५८ ॥**

**अन्वय**—नाना आपुला नाश साधुनि, बोध बोधें लाजिन्नला. येथें अनुभवू नुसधेपणें थोटावला. ॥ ५८ ॥

**अ. वि.**—अथवा बोधरूप ब्रह्मापुढें, बोधवृत्ति नाहींशी झाली. म्हणजे लाजली ब्रह्मवस्तू केवळज्ञानमात्र असल्यामुळें, अनुभववृत्तीनें ब्रह्मापुढें हात टेंकले.

**भिंगाचिया चडळा । पदराचा पुंज वेगळा ॥**
**करितां जैसा निफळा । आंगाचा होये ॥ ५९ ॥**

**अन्वय**— भिंगाचिया चडळा पदराचा पुंज वेगळा करितां, (जैसा तो चडळा) आंगाचा निफळा होये ॥ ५९ ॥

**अ. वि.**—अभ्रकाचा एक वाटोळा तुकडा घेऊन, त्याचे पापुद्रे काढित गेले तर, त्या तुकड्याचें अंगच नष्ट होतें.

**कां गजबजिला उवा । पांघुरणें केळीचा गाभा ॥**
**सांडी तेव्हेळी उभा । कैचा कीजे ॥ ६० ॥**

**अन्वय**—कां केळीचा गाभा, उबा गजबजिला पांघुरणें सांडि तेव्हेळीं (तो गाभा उभा) कैचा कीजे ? ॥ ६० ॥

**अ. वि.**—केळीचा गाभा, त्यास उकडावयास लागल्यामुळें गज-बजून सोपटें काढून टाकावयास लागला, तर तो केळीचा गाभा, उभा कसा राहील ? म्हणजे त्याचें अंगच नष्ट होईल.

**तैसें अनुभाव्य अनुभाविक । इहीं दोहीं अनुभूतिक ॥**
**ते गेलिया कैचे एक । एकासीचि ॥ ६१ ॥**

**अन्वय**—तैसा अनुभूतिक, अनुभाव्य (व) अनुभाविक, इहीं दोन्हीं सह गेलिया, एकासीचि एक कैचें ? ॥ ६१ ॥

**अ. वि.**—त्याप्रमाणें अनुभव, अनुभाव्य (ज्याचा अनुभव करावयाचा) व अनुभाविक (अनुभव करणारा) ह्या दोहोंसह गेला, म्हणजे अनुभवाची त्रिपुटी गेली; मग एक एकाला कोठले? म्हणजे एकमेकांचा काय संबंध राहिला?

**अनुभवा ह्या ठावोवरी । आपुलीच अनवसरी ॥**
**तेथें अक्षराची हारी । वाइल काई ॥ ६२ ॥**

**अन्वय**—हा ठावोवरि जेथें अनुभवा आपुलीच अनवसरी, तेथें अक्षराची हारी बाईल काई ! ॥ ६२ ॥

**अ. वि.**—वर सांगितल्याप्रमाणें, जेथें अनुभवाची त्रिपुटी नाहींशी होते, ( जेथें अनुभवाची दाद लागत नाहीं, अनुभवाला टिकावयास कालहि मिळत नाहीं) तेथें अक्षराची हारी (शब्दाची ओळ) काय चालणार ! कारण, कोणत्याही वस्तूचे, अनुभवानंतर, शब्दानें वर्णन करितां येतें.

**कां परेसी पडे मिठी । तेथें नादा सळु नुठी ॥**
**मा वावरीजेल वोठी । हें कें आहे ॥ ६३ ॥**

**अन्वय.**—कां जेथें परेसी मिठी पडे तेथें नादा सळु नुठी, मा ओठी वावरीजेल हें के आहे ! ॥ ६३ ॥

**अ. वि.**—जेथें परावाणी नाहींशी होते, तेथें नादाची रेषा उमटत नाहीं. अशा स्थितींत, ही गोष्ट ओंठांनीं बोलावी, हें कसें घडेल !

**चेइलिया पाठीं । चेवणयाच्या गोठी ॥**
**कीं धाला बैसे पाठीं । रंधनाच्या ॥ ६४ ॥**

**अन्वय**—चेइलिया पाठी चेवणयाच्या गोठी (के आहे)? कीं धाला रंधनाच्या पाठी बैसे? ॥ ६४ ॥

**अ. वि.**—निद्रेंतून पूर्ण जागा झाल्यावर जागा करण्याची गोष्ट कोठें आहे ! जेऊन तृप्त झालेला पुनः स्वयंपाकाच्या मागें कशाला लागेल !

**उदेलिया दिवसपति । तै कीं दिवे सेजे येती ॥**
**वांचूनि पिकला शेती । सुइजताती नांगर काई ॥ ६५ ॥**

**अन्वय.**—दिवसपति उदेलिया दिवे शेजे येती, वांचोनी पिकल्या शेतीं नांगर सुईजताती काई? ॥ ६५ ॥

**अ. वि.**—सूर्य उगवल्यावर दिवे निजेस येतात, म्हणजे निस्तेज होतात; शेतांत असलेलें पीक काढल्यावांचून, त्या शेतांत नांगर घालतात काय?

**म्हणोनि बंधमोक्षाचें व्याज । नाहीं निमालें काज ॥**
**आतां निरुपण भोज । बोळगे जरी ॥ ६६ ॥**

**अन्वय**—ह्मणोनि बंधमोक्षाचें व्याज नाहीं. काज निमालें. आतां निरूपण भोज जरी बोळगे ॥ ६६ ॥

**अ. वि.**—म्हणून बंधमोक्षाचें निमित्त जें ज्ञानाज्ञान तें गेलें; म्हणजे ब्रह्मीं ज्ञानाज्ञानधर्मांचा अभाव आहे. आतां शब्दानें निरूपणाचें कौतुक केलें, तरी शब्दाची शक्ति किती आहे, हें पुढील दोन ओव्यांतून सांगतात. ही ओवी, व याच्या पुढील दोन ओव्या, अशा तीन ओव्यांत पुढील प्रकरणाचें अवतरण आहे.

**आणि पुढिला कां आपणापें । वस्तु विसराचेनि हातें हारपे ॥**
**मग शब्देंचि घेपे । आठवूनिया ॥ ६७ ॥**

**अन्वय**—आणि पुढिला कां आपणापें विसराचे हातें हारपे, मग शब्देंचि आठवूनियां घेपे. ॥ ६७ ॥

**अ. वि.**—आपल्या किंवा दुसऱ्याच्या हातून एखाद्या वस्तूची विस्मृति होऊन, ती हरवली, तर त्या वस्तूची कोणीं शब्दानें आठवण दिली, कीं ती प्राप्त होते.

**येतुलियाही परौतें । चांगावें नाहीं शब्दातें ॥**
**जरी स्मारकपणें कीर्तीतें । मिरवी हा जगीं ॥ ६८ ॥**

**इति श्रीसिद्धानुवादे श्रीमदनुभवामृते सच्चिदानंदपदत्रयविवरणं नाम पंचमप्रकरणं संपूर्णम्.**

**अन्वय**—येतुलियाही परौते (येथें) शब्दातें चांगावें नाहीं, जरी हा (शब्द) स्मारकपणें जगीं कीर्तीतें मिरवी. ॥ ६८ ॥

**अ. वि.**—आपल्या किंवा दुसऱ्याच्या हातून हारवलेल्या वस्तूचें स्मरण शब्द करून देतो, अशी स्मारकपणाची कीर्ति जरी शब्द जगांत मिरवीत असला, तरी शब्दाचा इतकाच चांगलेपणा आहे. या पलीकडे शब्दाचा चांगुलपणा नाहीं. हाच विचार सहाव्या प्रकरणाच्या आरंभीं केला आहे; म्हणजे शब्दाच्या चांगुलपणाची अथवा स्मारकपणाची कीर्ती कोठपर्यंत आहे, याचा विचार सांगितला आहे.

इति श्रीसिद्धानुवादे श्रीमदनुभवामृतार्थविवरणे सच्चिदानंदपद-
त्रयविवरणं नाम पंचमप्रकरणं संपूर्णम् ।

